**नविन निविदा बोलविताना निविदांमध्ये मोबीलायझेशन ॲडव्हांस व मशिनरी ॲडव्हांस देण्याची तरतूद न ठेवणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक निविदा-१००९/(५६०/२००९) मोप्र-१

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २२/१०/२०१०

**वाचा :-** १) शासन परिपत्रक इंग्रजी No JAY2179/(1169)/MAJ-6, Dated 14/05/1981

२) शासन निर्णय इंग्रजी No CAT-1080/(319/86)/MP(Adm), Dated 28/05/1987

३) शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-१०९७/(५४/९७)/मोप्र-प्र, दिनांक ३१.३.२०००

४) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१०९७/(५४/९७) /मोप्र-प्र, दिनांक २६.६.२०००

५) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-०३०८/(१८९/०८)/मोप्र-१, दि.१६.४.२००८

६) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-०५०८/(३३३/०८)/ मोप्र-१, दि. २५ जुलै २००८

**प्रस्तावना :-**

जलसंपदा विभागाकडील पाटबंधारे प्रकल्पांच्या कामाच्या बी-१/बी-२ निविदांमध्ये Mobilisation Advance देण्याची तरतूद उपरोक्त क्र. १ च्या परिपत्रकान्वये करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे पाटबंधारे प्रकल्पांच्या कामांसाठी Machinary Advance देण्याची तरतूद उपरोक्त क्र. २ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे.

नवीन निविदा बोलाविताना निविदांमध्ये काही सुधारणा करण्याच्या दृष्टीने कंत्राटदारांस आगाऊ रक्कम देण्याची कोणतीही तरतूद Mobilization Advance व Machinery Advance बाबत निविदेमध्ये ठेऊ नये, अशा सूचना वरील ३ येथील परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आलेल्या होत्या. सदर परिपत्रक रद्द झाल्याचे उपरोक्त संदर्भ क्र. ४ येथील परिपत्रकान्वये सूचित करण्यात आलेले होते. तद्नंतर वरील संदर्भ क्र. ५ येथील परिपत्रकान्वये कंत्राटदारांस आगाऊ रक्कम देण्याची कोणतीही तरतूद निविदेमध्ये ठेऊ नये, अशा फेरसूचना देण्यात आलेल्या होत्या. सदर परिपत्रक उपरोक्त संदर्भ क्र. ६ येथील परिपत्रकान्वये रद्द करण्यात आलेले आहे.

या विभागाकडील पाटबंधारे प्रकल्पाच्या कामासाठी काही प्रकरणी संबधीत कंत्राटदाराला Mobilization Advance व Machinery Advance अदा केल्याने व सदर प्रकल्प भूसंपादनातील अडचणी, स्थानिक जनतेचा विरोध, नैसर्गिक आपत्ती, कंत्राटदाराच्या वैयक्तीक अडचणी, इत्यादी कारणांमुळे पुर्वनियोजित कालावधीप्रमाणे पुर्ण होऊ न शकल्याने शासनाचा निधी, जरी त्यावर व्याज मिळत असले तरी तो विकास कामासाठी न वापरला जाता नाहक अडकून पडत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यामुळे अशी प्रकरणे उद्भवू नयेत व शासनाचा निधी अनुत्पादक बाबीसाठी अडकून पडू नये यासाठी कंत्राटदाराला पाटबंधारे प्रकल्पाच्या कामासाठी Mobilization Advance व Machinery Advance अदा न करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जलसंपदा विभागाकडील पाटबंधारे प्रकल्पांच्या कामाच्या निविदांमध्ये Mobilisation Advance व Machinary Advance देण्याच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात आलेले वरील संदर्भिय क्र. १ ते ६ येथील शासन निर्णय व शासन परिपत्रक या शासन निर्णयान्वये अधिक्रमीत करुन शासन आता पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

जलसंपदा विभागाकडील पाटबंधारे प्रकल्पांच्या कामाच्या निविदांमध्ये कंत्राटदाराला कोणत्याही प्रकारचे Mobilisation Advance व Machinary Advance देण्याची तरतूद करण्यात येऊ नये व देण्यात येऊ नये.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०१०२२१४११५७००१ असा आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**( दी. धों. भिडे)**
मुख्य अभियंता व सह सचिव

प्रत,

महालेखापाल १/२, (लेखा परिखा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
खाजगी सचिव, मा. मंत्री, (कृ.खो.पा.म. वगळून) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. मंत्री, (कृ.खो.पा.म.) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. मंत्री, (खारभूमी) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, खारभूमी जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मा. विधान सभा/ विधान परिषद सदस्य, सर्व
स्वीय सहायक, सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मु.अ.(दवप्र)व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मु.अ.(जसं) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मु.अ.(कृपातंल)व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मु.अ.(पा), व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व तांत्रिक उपसचिव/अवरसचिव/उपअभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

प्रत, आवश्यक कार्यवाहीसाठी,

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद.
जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय मुख्य अभियंता
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिकस्तर) विभाग, येरवडा, पुणे.
जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय अधीक्षक अभियंता
जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय कार्यकारी अभियंता/मोप्र-१ कार्यासन संग्रहार्थ